**मंत्रिमंडळ प्रस्ताव सादर करण्यासंदर्भात आणि मंत्रिमंडळ निर्णयांची अंमलबजावणी विहित वेळेत पूर्ण करण्यासंदर्भात <u>अवलंबविण्याची कार्यपध्दती..</u>**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग,**

मुख्य सचिव कार्यालय,

**शासन परिपत्रक क्रमांक : मुसका-२०१५/ई-१५७११०/का-१,**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक : २५ ऑगस्ट, २०१५.

<u>शासन परिपत्रक</u>

मंत्रालयीन विभागाने सादर केलेल्या मंत्रिमंडळ प्रस्तावास मंत्रिमंडळाची मान्यता मिळाल्यावर त्या निर्णयाच्या अंमलबजावणीसाठी शासन निर्णय त्वरित निर्गमित होणे अपेक्षित आहे. असे शासन निर्णय त्वरित निर्गमित होण्यासाठी, प्रचलित कार्यपध्दतीत करावयाच्या सुधारणेबाबत दिनांक १२/०८/२०१५ रोजी घेतलेल्या सचिव समन्वय समितीच्या बैठकीत सर्व सचिवांशी सविस्तर चर्चा करण्यात आली. त्या चर्चेच्या अनुषंगाने पुढील प्रमाणे कार्यपध्दती अनुसरणेबाबत सर्व मंत्रालयीन विभागांना निर्देशीत करण्यात येत आहे.

१) मंत्रिमंडळ प्रस्ताव सादर करीत असतांना विभागाने त्या अनुषंगाने निर्गमित करावयाच्या शासन निर्णयाचे प्रारुप देखील प्रस्तावासोबत सादर करावे.

२) मंत्रिमंडळाने विभागाच्या प्रस्तावास व प्रारुप शासन निर्णयास, **<u>कोणतीही सुधारणा न सुचविता</u>** मान्यता दिल्यास तो शासन निर्णय पुन्हा वित्त विभाग व नियोजन विभागाकडे अनौपचारिक संदर्भासाठी न पाठविता संबंधित विभागाने तात्काळ निर्गमित करावा.

३) मंत्रिमंडळाने विभागाच्या प्रस्तावित अथवा प्रारुप शासन निर्णयात **<u>काही सुधारणा सुचविली असल्यास,</u>** असा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी वित्त विभाग व नियोजन विभागाकडे अनौपचारिक संदर्भासाठी पाठविण्यात यावा. वित्त व नियोजन विभागाने अशा प्रकरणी **<u>०७ दिवसांच्या आत</u>** आपले अभिप्राय द्यावेत.

४) वरिल प्रमाणे कार्यवाही करतांना वरील क्रमांक (२) मध्ये नमुद केल्याप्रमाणे शासन निर्णय तात्काळ निर्गमित करण्यात अथवा वरील क्रमांक (३) मध्ये नमूद केल्याप्रमाणे वित्त विभाग व

नियोजन विभागाचे अभिप्राय प्राप्त करुन शासन निर्णय निर्गमित करण्यात, काही धोरणात्मक बाबींमुळे अथवा अन्य अपरिहार्य कारणांमुळे अडचण असल्यास अशी प्रकरणे संबंधित विभागाच्या सचिवांनी **तात्काळ** मुख्य सचिवांचे निदर्शनास आणावीत.

२. वरील निर्देशांचे काटेकोरपणे पालन होईल याची दक्षता संबंधित मंत्रालयीन विभागांनी घ्यावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२५१६०३२७९५०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swadheen S Kshatriya

Digitally signed by Swadheen S Kshatriya
DN: c=IN, o=All India Service, ou=Chief Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Swadheen S Kshatriya
Date: 2015.08.26 12:19:56 +05'30'

**( स्वा.शि. क्षत्रिय )**

**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव

३) सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

४) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, सचिव मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई

५) सर्व मंत्रालयीन विभाग

६) निवड नस्ती (का.१)